त्यांची कारकीर्द शांतपणें गेली. त्याचा मुलगा बुऱ्हाणशहा (१५६०–६१) याच्या वेळीं त्याचा प्रधान तुफालखान यानें बंड करून त्यास नर्नाळा किल्ल्यांत कैदी केलें. १५७२ सालीं अहमदनगरच्या मुर्तुजा निजामशहानें बुऱ्हाणास सोडविण्याच्या मिषानें वऱ्हाडवर स्वारी केली व तुफालखान, त्याचा मुलगा आणि बुऱ्हाण यांनां पकडून ठार केलें. अशा रीतीनें वऱ्हाडांतील इमामशाहीचा ८५ वर्षांनंतर शेवट झाला. याप्रमाणें वऱ्हाड जरी निजामशाहीकडे गेलें तरी तिच्या आपसांतील भांडणामुळें १५९६ मध्यें सुलतान मुराद यानें वऱ्हाड जिंकून घेतलें. जरी वऱ्हाडांत वेगवेगळे राजे आले तरी त्यांनी पूर्वीची, परगण्यांतील व खेड्यांतील वसूल गोळा करणें ही व इतर हिंदूंची राज्यव्यवस्थापद्धति कायम ठेविली; औरंगझेबानें मात्र पुष्कळ देशमुख, देशपांड्यांनां बाटविलें. ते अद्याप गोमांस खात नाहींत व त्यांचीं नांवेंहि हिंदूसारखीं आहेत; मोंगलराज्यास वऱ्हाड जोडल्यानंतर मुरादानें बाळापुरापासून ६ मैलांवर शहापूर नांवाचें शहर वसविलें व तेथें आपला तळ दिला; व नवीन जिंकलेला प्रांत मोंगल सरदारांस वाटून दिला. १५९८ मध्यें मुरादच्या मृत्यूनंतर अकबरनें अहमदनगर जिंकल्यानंतर अहमदनगर, खानदेश, व वऱ्हाडची सुभेदारी दानियल यास दिली. त्याच्या मागें वऱ्हाड हें मालिक अंबरनें पुन्हां जिंकून निजामशाहींत दाखल केलें, पण शहाजहानच्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षीं पुन्हां वऱ्हाड मोंगलांच्या ताब्यांत आलें. १६३६ मध्यें मोंगलांच्या दख्खनच्या चार सुभ्यांपैकीं वऱ्हाड एक होता तेव्हां त्याची राजधानी एलिचपूर व मुख्य किल्ला गाविलगड होता. या चार सुभ्यांचा सुभेदार औरंगझेब होता. तेव्हां मराठ्यांनीं वऱ्हाडवर बऱ्याच स्वाऱ्या केल्या व पुष्कळ खंडणी घेतली.

१६८०त संभाजी व १६९८त राजाराम यांनीं देवगडच्या गोंड राजाच्या मदतीनें सर्व प्रांत उध्वस्त केला. मराठ्यांनां १७१८ त वऱ्हाडची चौथाई मिळाली. निजाम व खानदेशचा सुभेदार मुबारिझ यांची १७२४ च्या सुमारास साखरखेडलें येथें लढाई होऊन निजामचा जय झाला व तो दख्खनचा सुभेदार होऊन तेव्हांपासून वऱ्हाड त्याच्या ताब्यांत गेला. तो अद्यापपर्यंत त्याच्याकडे ( नांवानें) चालूच आहे. नागपूरकर भोंसल्यांनीं सर्व प्रांतभर आपले अधिकारी ठेविले होते; त्यांचें सैन्यहि तेथें होतें; तेच तेथील निम्में अधिक उत्पन्न घेत. परंतु निजाम हा या वऱ्हाडचा मालक म्हणून नेहमीं हक्क प्रतिपादीत असे; उद्गीरच्या लढाईनंतर ( १७६० ) मेहकर व दक्षिणेकडील कांहीं परगणे व खर्ड्याच्या लढाईनंतर ( १७९५ ) उंबरखेड व कांहीं परगणे पेशव्यांनां मिळाले, निजाम आणि भोंसले यांच्यामध्यें वऱ्हाडांतील वर्चस्वाविषयीं झटापट १७३७ मध्यें सुरू झाली तिचा १८०३ मध्यें शेवट झाला. त्यावेळीं वेल्स्लीनें गाविलगड घेतल्यानंतर भोंसल्यांनीं तह करून वर्धा, गाविलगड आणि नर्नाळा यांच्या पश्चिमेकडील प्रदेशाचा हक्क सोडून दिला. १८०४ मधील हैदराबादच्या तहाप्रमाणें हा प्रदेश निजामकडे गेला. शिंद्याकडूनहि निजामाला सिंधखेड व जालनाच्या भोंवतालचा प्रदेश परत मिळाला. यापुढें (१८०३–२०) पेंढाऱ्यांनीं व भिल्लांनीं वऱ्हाडास त्रास दिला. स. १८२२ च्या तहान्वयें वऱ्हाडची पूर्व सीमा वर्धा नदी ठरली व मेळघाटाजवळील प्रदेश, वर्ध्याच्या पूर्वेकडील प्रदेशाबद्दल आणि पेशव्यांच्या मुलुखाबद्दल निजामास परत मिळाला.

या सुमारास 'पामर आणि कंपनी'नें आपला पगडा निजामावर बसवला. मेटकाफ् यानें तिच्याविरुद्ध प्रयत्न केला तरी तो सिद्धीस गेला नाहीं. या कंपनीनें निजामाला वऱ्हाडांतील सैन्यखर्चाबद्दल शेंकडा २४ प्रमाणें कर्ज दिलें होतें. हैदराबाद येथील पूरणमल नांवाच्या मोठ्या सावकारानें वऱ्हाडांतील बहुतेक भाग धान्यानें लावून घेतला होता; परंतु १८३९ मध्यें रेसिडेंटच्या आग्रहामुळें त्यास हांकून देण्यांत आलें. पुढें पेस्तनजी कंपनी निघाली. ही कांहीं पारशी व्यापाऱ्यांनीं काढलेली होती व १८२५–२६ मध्यें वऱ्हाडांतील कापूस मुंबईस नेण्याचें काम तिनें आरंभिलें. कापूस पिकवणारास मोठमोठ्या रकमा त्यांनीं दिल्या व खामगांव वगैरे ठिकाणीं कापूस दावण्याचे कारखाने काढून निजामच्या मुलुखांतील माल बाहेर नेण्याचें काम स्वीकारलें. १८४१ मध्यें दिवाण चंदुलाल यानें संस्थानच्याकडे जें कर्ज होतें त्याच्या फेडीदाखल वऱ्हाडांतील वसुलाचें उत्पन्न दिलें; परंतु १८४३ मध्यें त्या दिवाणानें राजीनामा दिला व संस्थानचें अगदीं दिवाळें वाजण्याच्या बेतांत आल्यामुळें पेस्तनजीस वऱ्हाड सोडावें लागलें. चंदुलालच्या गैरव्यवस्थेमुळें उत्पन्न कमी झालें. तेव्हां १८४३ त व पुढें इंग्रजी तैनातफौजेचा खर्च भागविण्यास इंग्रजसरकारास रोख पैसा द्यावा लागला. पण १८५० पावेतों पुष्कळ बाकी सांचली; व १८५३ त ही बाकी व इतर बाबींचें मिळून इंग्रजसरकारचें एकंदर ५३ लाख कर्ज झालें. १८५३ मध्यें निजामाशीं नवा तह होऊन इंग्रजसरकारास कर्ज फेडीदाखल ५० लाख वसुलाचा प्रदेश मिळाला. ह्याच मुलुखास हल्लीं वऱ्हाड असें म्हणतात. या तहान्वयें खऱ्या वऱ्हाडाशिवाय धाराशिव व रायचूर दुआब हे जिल्हे इंग्रजांकडे जास्त आले. दर वर्षी हिशोब करून जास्त उत्पन्न झालें तर तें निजामास परत द्यावें असेंहि ठरलें. या तहामुळें निजामास हिशोब दरसाल देणें फार त्रासदायक व गैरसोयीचें झालें. व स. १८०२ च्या व्यापारी तहाप्रमाणें कर बसाविण्यांत पुष्कळ अडचणी उत्पन्न झाल्या. याकरितां व १८५७ तील निजामच्या मदतीचें बक्षीस म्हणून १८६० मध्यें नवा तह झाला व निजामला ५० लाख रु. कर्जाची सूट देऊन सुरापूर, धाराशिव व रायचूर प्रांत दिले. उलट गोदावरीच्या दक्षिण तीरावरील प्रदेश त्यानें इंग्रजांनां दिला. व १८५३ प्रमाणेंच वऱ्हाडची व्यवस्था असावी असें कबूल केलें.

१७४३२
श्रीमन्‌... ग्रंथालय

